**श्री. संतोष कवडे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांची सह संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन आदेश क्रमांक : रुसायो-२०२१/प्र.क्र.१९७/विशि-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
४ था मजला, मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७ ऑक्टोबर, २०२१

संदर्भ:- (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः-एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/ कार्यासन-१२, दि.१७.१२.२०१६

(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः-एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/ कार्यासन-१२, दि.१६.०२.२०१८

(३) राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई यांचे अ.शा.पत्र क्र.राप्रसं/रुसा/२०२१-२२/३६९, दि.०९.०९. २०२१

(४) अवर सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई यांचे पत्र क्र.मविसे-१०२१/प्र.क्र.१३६/२०२१/आस्था-३, दि.१२.१०. २०२१

शासन आदेश-:

राज्य शासनाच्या विविध विभागात/विभागाच्या अधिपत्याखालील मंडळे/महामंडळातील पदांवर प्रतिनियुक्तीने नेमणूका करण्याबाबतचे धोरण सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७.१२.२०१६ तसेच दि.१६.०२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयांन्वये घोषित करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन श्री. संतोष कवडे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांची उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारीतील राज्य प्रकल्प संचालनालयातील सह संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई या पदावर प्रथमत: ३ वर्षासाठी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(१) श्री. संतोष कवडे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी हे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ज्या तारखेला ते आपल्या मूळ शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेला त्यांची प्रतिनियुक्तीवरील सेवा समाप्त होईल.

(२) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

(३) जर त्यांची प्रतिनियुक्तीवरील सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे.

(४) श्री. संतोष कवडे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत जाण्याची मुभा राहील.

(५) ग्राम विकास विभागाने संदर्भीय क्र.(४) येथील दिनांक १२.०१०.२०२१ रोजीच्या पत्रान्वये श्री. संतोष कवडे यांना उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारीतील राज्य प्रकल्प संचालनालयातील सह संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्यास सहमती दर्शविली असल्याने श्री. संतोष कवडे यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर नियुक्ती स्वीकारण्यासाठी ग्राम विकास विभागाने त्वरीत कार्यमुक्त करावे.

(६) राज्य प्रकल्प संचालक, राज्य प्रकल्प संचालनालय, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान, मुंबई यांनी श्री.संतोष कवडे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू करुन घ्यावे व रुजू अहवाल उच्च व तंत्र शिक्षण विभागास तसेच ग्राम विकास विभागास पाठवावा.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे) नियम, १९८१ च्या नियम ४० (परिशिष्ट दोन) मधील तरतूदीनुसार राज्य प्रकल्प संचालक, राज्य प्रकल्प संचालनालय, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान, मुंबई व ग्राम विकास विभाग यांनी श्री.संतोष कवडे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती आपआपसात ठरवाव्यात.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२७११५२२२७००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravinkumar Gulabrao Pawar

Digitally signed by Pravinkumar Gulabrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8de261729f06eda4a56aba947eceb6140d7406426b2f08c9317bea2458ec1f92, serialNumber=8f18625adb482a7ee2512cea93ce697388c95a99c89e41e85c05a3de8476488f, cn=Pravinkumar Gulabrao Pawar
Date: 2021.10.27 11:57:23 +05'30'

**(प्रविणकुमार पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. संतोष कवडे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद

**प्रत:-**

१) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.

४) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

५) राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद

७) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) निवड नस्ती (विशि-३) , उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.